**महानगरपालिका / नगरपालिका यांनी रस्ता अनुदानामधून किमान १०% तंरतूद वाहतूक नियंत्रण व्यवस्था, रस्त्यावरील दिशा दर्शक फलक व इतर स्ट्रीट फर्निचर बसविणे, झेब्रा क्रॉसिंग तयार करणे इत्यादीसाठी खर्च करणे.**

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०११/प्र.क्र.७४/नवि-१६**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १८ जुलै,२०११**

**प्रस्तावना:-** राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना शासनाकडून नागरी भागातील रस्ते तयार करणे / रस्ते दुरुस्ती व त्याअनुषंगिक प्रयोजनासाठी लोकसंख्येनुसार रस्ता अनुदान वितरित केले जाते.

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांना शासनाकडून मिळणा-या रस्ता अनुदानामधुन काही विवक्षित तरतुद शहरातील वाहतूक व्यवस्था सुस्थितीत चालू ठेवण्यासाठी शहरातील चौक व रस्त्यांवर वहातूक नियंत्रण व्यवस्था कार्यान्वित करणे, रस्त्यांवर दिशा दर्शक फलक बसविणे, रस्त्यांच्या मध्यभागी दुभाजक टाकणे, रस्त्यावरील लेन मार्किंग सुस्पष्ट व्हावी म्हणुन विविध रंगामध्ये पट्ट्या देणे इत्यादी बाबींसाठी खर्च करणे बंधनकारक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात सर्वंकष विचार करुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-** शासनाकडुन प्राप्त होणा-या रस्ता अनुदानामधून किमान १० % निधी वाहतूक पोलिस यांच्याशी सल्ला मसलत करुन ठरविण्यात आलेल्या प्राथम्यक्रमानुसार शहरातील चौक व रस्त्यांवर वाहतूक नियंत्रण व्यवस्था निर्माण करणे व त्याची देखभाल व दुरुस्ती करणे, रस्त्यावरील लेन मार्किंग निश्चित करण्यासाठी वेगवेगळ्या रंगातील पट्ट्यांची आखणी करणे, रस्त्यावर झेब्रा क्रॉसिंग पट्टे मारणे, रस्त्यावर दिशा दर्शक फलक व इतर स्ट्रीट फर्निचर बसविणे, पदपथ व रस्त्यांच्या मध्यभागी दुभाजक निर्माण करणे इत्यादी प्रयोजनासाठी खर्च करणे सर्व संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना बंधनकारक राहील.

सदरचे आदेश हे वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. २३९/व्यय-३, दिनांक २७ मे, २०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०११०७१८१८२७३९००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**(मनु कुमार श्रीवास्तव)**
**प्रधान सचिव (२),महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
अप्पर मुख्य सचिव, (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव, (परिवहन) गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
प्रधान सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
आयुक्त तथा संचालक, नगर पालिका प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई
विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक नगरपालिका प्रशासक (सर्व)
आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्याधिकारी, नगरपरिषदा (सर्व)
प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्टॉफ ऑफिसर, मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती (नवि-१६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.